**सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट "अ" या पदावर सरळसेवेने नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: डीपीपी-०८२३/प्र.क्र.१६१/पोल-१०,**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २१ फेब्रुवारी, २०२५.

**संदर्भ** :- १. गृह विभाग शासन निर्णय क्रमांक: एसपीपी-२२९५/प्र.क्र.१४९/पोल-१०, दि.२० मे १९९७.
२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे क्रमांक:- एचएमआर§१६२३/प्र.क्र.९९/२०२३/ अठ्ठावीस, दिनांक २३.०८.२०२३ चे पत्र.
३. गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक: डीपीपी-०८२३/प्र.क्र.१६१/पोल-१०, दिनांक ०२ जानेवारी २०२५.
४. गृह विभाग शासन पुरकपत्र क्रमांक: डीपीपी-०८२३/प्र.क्र.१६१/पोल-१०, दिनांक ६ जानेवारी २०२५.

**शासन निर्णय :-**

संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिनस्त विविध आस्थापनेवर "सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट "अ" ची पदे संदर्भ क्रमांक १ वरील दि.२०.०५.१९९७ अन्वये निर्माण करण्यात आली आहेत. सेवाप्रवेश नियमानुसार, सदर पदे ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत सरळसेवेने भरावयाची आहेत. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन दिनांक २३.०८.२०२३ च्या पत्रान्वये, सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट "अ" या पदांकरीता एकूण ५३१ उमेदवारांची शिफारस केली आहे. शिफारस प्राप्त एकूण ५३१ उमेदवारांपैकी ४९१ उमेदवारांना संदर्भ क्रमांक ३ दिनांक ०२.०१.२०२५ अन्वये नियुक्ती देण्यात आलेली आहे. आता, चारित्र्य पडताळणी समितीच्या शिफारशीस शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार शिफारस प्राप्त २२ उमेदवारांना महाराष्ट्र शासकीय गट अ व गट ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदावर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम २०२१ मधील मार्गदर्शक सूचनानुसार महसूल विभाग वाटप करण्यात आले आहे. नागरी सेवा मंडळाने दि.१४.०२.२०२५ रोजीच्या बैठकीमध्ये शिफारस केल्याप्रमाणे आणि शासनाने मान्यता दिल्यानुसार, सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट "अ" या पदावर उमेदवारांच्या नावापुढे दर्शविलेल्या ठिकाणी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ.क्र | शिफारस क्रमांक | नाव | प्रवर्ग | वाटप करण्यात आलेला महसूली विभाग | नियुक्तीचा जिल्हा |
|---|---|---|---|---|---|
| १ | ९ | श्रीमती प्रमोदिनी पंडीत टेकाळे @ प्रमोदिनी धनाजी मुळे | खुला सर्वसाधारण ६ | कोकण-२ | मुंबई |
| २ | ३२ | श्रीमती विजयश्री माधवराव पाटील | खुला महिला-१३ | छ.संभाजीनगर | लातूर |
| ३ | ९२ | श्री. कैलाश विठ्ठलराव वेरूळकर | खुला सर्वसाधारण - ५४ | नागपूर | वर्धा |
| ४ | १४८ | श्री. अनिल बाळासाहेब विधाते | खुला सर्वसाधारण - ८५ | नाशिक | अहमदनगर |
| ५ | १५४ | श्री. अभिजीत बन्सीलाल अंदोरे | खुला सर्वसाधारण - ८९ | नाशिक | जळगांव |
| ६ | १५८ | श्री. अशोक भिमराव शेळके | खुला सर्वसाधारण - ९४ | पुणे | सोलापूर |
| ७ | १६५ | श्रीमती स्विटी सुर्यकांत शिंदे @ गायत्री मोरे | खुला सर्वासाधारण -१०१ | कोकण-२ | ठाणे |
| ८ | १८६ | श्रीमती प्राजक्ता बाळासाहेब आरने | खुला खेळाडू विरूध्द ८ | छ.संभाजीनगर | जालना |
| ९ | १९९ | श्री. मोहम्मद इस्राईल मोहम्मद युसूफ | इतर मागास वर्ग सर्वसाधारण ३ | कोकण-२ | रायगड |
| १० | २०३ | श्री.किशोर मधुकरराव पंचगडे | इतर मागास प्रवर्ग सर्वसाधारण ४ | अमरावती | अमरावती |
| ११ | २२२ | श्री.नितीन रामकृष्ण वाघ | इतर मागास वर्ग सर्वसाधारण ९ | नाशिक | अहमदनगर |
| १२ | २५३ | श्री.कैलास ज्ञानदेव बोरसे | भटक्या जमाती - क सर्वसाधारण २ | नाशिक | धुळे |
| १३ | २९५ | श्री.रामेश्वर मनमथप्पा ढेले | इतर मागास प्रवर्ग सर्वसाधारण २४ | छ.संभाजीनगर | लातूर |
| १४ | ३०२ | श्री.दिपक अभिमान मोरे | भटक्या जमाती- ब सर्वसाधरण २ | नागपूर | चंद्रपूर |
| १५ | ३४१ | श्रीमती शबाना सय्यद शेख | इतर मागास प्रवर्ग महिला - २४ | पुणे | सातारा |
| १६ | ३५४ | श्री.सिध्दांत बाळासाहेब जगताप | अनुसूचित जाती खेळाडू विरूध्द ३ | अमरावती | यवतमाळ |
| १७ | ३५९ | श्री.रवी (गोविंद) लक्ष्मणराव शिंदे | आर्थिक मागास प्रवर्ग सर्वसाधारण १३ | छ.संभाजीनगर | लातूर |
| १८ | ३८३ | श्री.राहूल विठ्ठल वारंग | भटक्या जमाती -क सर्वसाधारण ६ | पुणे | सातारा |
| १९ | ४२८ | श्री.संतोष व्यंकटराव काळे | आर्थिक मागास प्रवर्ग सर्वसाधारण २० | छ.संभाजीनगर | धाराशिव |
| २० | ४५० | श्रीमती रत्ना शिवाजी विंचूरकर | विशेष मागास प्रवर्ग महिला ४ | कोकण-१ | रत्नागिरी |
| २१ | ४९१ | श्री.चेतन रमेश भोई | भटक्या जमाती - ब सर्वसाधारण ९ | नागपूर | चंद्रपूर |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २२ | ५०२ | श्री. रविंद्र रामदास चांगन | भटक्या जमाती - क सर्वसाधारण १८ | पुणे | सांगली |

२. वरील उमेदवारांची नियुक्ती खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

(१) सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन मॅट्रीक्स मधील वेतन स्तर एस- २०- रु.५६१००-१७७५०० या वेतनश्रेणीमध्ये नियुक्ती करण्यात येत आहे.

(२) दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी विहित अटी व शर्तींच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे.

(३) प्रस्तुत नियुक्ती ही मा. मुंबई उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ मधील रिट याचिका क्रमांक ८४७४/२०१० महाराष्ट्र शासन व इतर विरुध्द शिवराम व्ही. चौधरी आणि इतर मधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहील. प्रस्तुत याचिकेचा निर्णय शासनाच्या बाजूने लागल्यास, थकबाकीची रक्कम शासनास परत करण्यात येईल." अशा आशयाचे क्षतिपूर्ती बंधपत्र (Indemnity Bond) संबंधीत उमेदवारांनी भरुन देणे बंधनकारक राहिल.

(४) परिविक्षा कालावधीमध्ये पहिली वार्षिक वेतनवाढ देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यानंतर शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक परिवि-२७१५/प्र.क्र.३०२/कार्या.८,दि.२२.०६.२०२१ नुसार नवीन परिविक्षा धोरणानुसार देण्यात येईल.

(५) परिविक्षाधीन अधिकारी यांनी त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या जिल्हा पदस्थापनेच्या ठिकाणी ३० दिवसांच्या आत रुजू व्हावे.

(६) प्रस्तुत पदावर रुजु होण्यास मुदतवाढ घ्यावयाची असल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्र. एसआरव्हि-२०१६/प्र.क्र.२८१/१२, दि.२१.०६.२०२१ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येईल.

(७) महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ मधील तरतुदीनुसार सदरहू उमेदवारांची ज्येष्ठता निश्चित करण्यात येईल.

(८) सदर परिविक्षाधीन सहाय्यक सरकारी अभियोक्ता यांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९.३.२००३ अन्वये संगणक हाताळणी / वापराबाबतचे शासन मान्यताप्राप्त आवश्यक ते प्रमाणपत्र नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षांच्या आत

विभाग प्रमुखाकडे सादर करणे अनिवार्य राहिल. अन्यथा प्रस्तुत पदावरील त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

(९) ज्या अधिकारी यांनी मराठी व हिंदी परीक्षा अगोदरच उत्तीर्ण केली नसेल किंवा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर मराठी व हिंदी भाषा परीक्षा यासंबंधी केलेल्या नियमानुसार त्यांना भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे बंधनकारक राहील.

(१०) मा. मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल रिट याचिका क्रमांक ७२२८/२०२४ आणि इतर यासंबंधीत न्यायालयीन प्रकरणी दि.२१.१०.२०२४ रोजी दिलेला अंतरीम आदेश तसेच O.A.No. ९३०/२०२३ एस. एम. हिरवे आणि इतर या न्यायालयीन प्रकरणांच्या अधीन राहून प्रस्तुत नियुक्ती देण्यात येत आहे. तसेच रिट याचिका क्रमांक ७२२८/२०२४ संदर्भात शासनास दिलेले बंधपत्र बंधनकारक राहील.

(११) अधिकारी यांना शासन सेवेत रुजू झाल्यानंतर सेवेचा राजीनामा दयावयाचा झाल्यास, शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही १०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दिनांक ०२.१२.१९९७ व वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अंनियो २०१९/प्र.क्र.४७०/सेवा-४, दिनांक ०९.०५.२०२२ मधील तरतुदी लागू राहातील. मात्र, गैरवर्तणूक, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी सूचना देण्याचे बंधन शासनावर राहणार नाही.

(१२) अधिकारी यांची पदस्थापना सदर शासन निर्णयामध्ये दर्शविण्यात आलेल्या जिल्हयातील मुख्य न्याय दंडाधिकारी, अतिरिक्त मुख्य न्यायदंडाधिकारी, प्रथम वर्ग न्यायदंडाधिकारी या न्यायालयात देण्याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे निर्गमीत करतील.

(१३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक अंनियो-१००५/१२६/सेवा ४, दिनांक ३१.१०.२००५ व शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक अंनियो-२०१२/९६/सेवा ४, दि.२७.०८.२०१४ मधील तरतुदीनुसार राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू राहील.

(१४) वर नमूद केलेल्या अटी व शर्ती व्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्याखालील राज्य सेवा अधिकाऱ्यांना लागू असलेले अन्य सर्व सेवाविषयक नियम उमेदवारांना लागू होतील.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.mahbarashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२२११७१५०९०५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUGRIV SAMBHAJI DHAPATE

Digitally signed by SUGRIV SAMBHAJI DHAPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FC102DE27DC1B41E747AC6CBB491C4209459C3CF340720EA98FD1D95B19C9F65, cn=SUGRIV SAMBHAJI DHAPATE
Date: 2025.02.21 17:16:26 +05'30'

**( सुग्रिव धपाटे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महासंचालक (न्यायीक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
४) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १२ व १६ ब), मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव (अ.व सु.) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सर्व सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
१२) सर्व संबंधित उमेदवार (संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या मार्फत)
१३) निवड नस्ती/पोल १०.